**स्थानिक विकास निधी कार्यक्रमांतर्गत विधीमंडळाच्या सर्व सभासदांना संगणक उपलब्ध करुन देण्याबाबत......**

---

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक सीओएम१०००/प्र.क्र.६१/२०००/३९,**

**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**

**दिनांक: २१ जुलै, २०००**

**प्रस्तावना:**

राज्याचे प्रशासन अधिक गतीमान व पारदर्शक करण्याच्या दृष्टीने माहिती तंत्रज्ञानाचा सुयोग्य वापर व्हावा, त्यासाठी शासनाच्या मुख्यालयात तसेच दुय्यम कार्यालयात संगणकीकरणाला चालना मिळावी यासाठी कालबध्द कृती कार्यक्रम राबविण्यात येत आहे. या कार्यक्रमाची अधिक प्रभावीपणे अंमलबजावणी व्हावी या दृष्टीने विधीमंडळाच्या सर्व सन्माननीय सभासदांना संगणक उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

स्थानिक विकास निधी कार्यक्रमांतर्गत विधीमंडळाच्या सर्व सन्माननीय सभासदांना त्यांच्या इच्छेप्रमाणे लॅपटॉप किंवा डेस्कटॉप आणि लेझर प्रिंटर उपलब्ध करुन देण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. या करीता संबंधित जिल्हाधिकारी यांनी सन्माननीय सभासदांना विचारणा करावी. त्यानंतर जिल्हाधिकारी सन्माननीय सभासदांच्या इच्छेप्रमाणे डेस्कटॉप किंवा लॅपटॉप आणि लेझर प्रिंटर त्यांच्या स्थानिक विकास निधीतून उपलब्ध करुन देतील. यासाठी पुढीलप्रमाणे मार्गदर्शक सूचना देण्यात येत आहेत:-

१) संगणक संयंत्रांची खरेदी ही शासकीय नियमांप्रमाणे करण्यात यावी.

२) लॅपटॉप/डेस्कटॉप/लेझर प्रिंटरची नोंद संबंधीत जिल्हाधिकारी कार्यालयाच्या जडवस्तु संग्रह नोंद वहीमध्ये घेण्यात यावी. दर करारावरील लॅपटॉप/डेस्कटॉप/लेझर प्रिंटरच्या विनिर्देशानुसार खरेदी करण्यात यावी.

३) डेस्कटॉप व लेझर प्रिंटर यासाठी आर्थिक मर्यादा रु.७०,०००/- (रुपये सत्तर हजार फक्त) एवढी राहील. लॅपटॉप व लेझर प्रिंटर यासाठी आर्थिक मर्यादा रु.१,५०,०००/-(रुपये एक लाख पन्नास हजार फक्त) एवढी राहील.

४) जिल्हाधिकाऱ्यांनी अशी खरेदी करतांना तीन वर्षाकरिता देखभाल-दुरुस्तीची तरतुद खरेदी अटीमध्ये घालावी. तद्नंतर अशा संगणक सयंत्रांच्या देखभाल-दुरुस्तीसाठी आवश्यक ती तरतूद माहिती तंत्रज्ञान संचालनालयाकडील योजनांतर्गत तरतूदीमधुन खर्च करण्यात यावी.

५) विधान मंडळ सचिवालयाच्या आदेशानुसार मा. आमदार महोदय आणि त्यांच्या कोणत्याही एका स्वीय सहाय्यकांस एक आठवडयाचे संगणक प्रशिक्षण घेता येईल. असे प्रशिक्षण देण्यासंदर्भात विधान मंडळ सचिवालयाने आवश्यक ती कार्यवाही/उपाययोजना तातडीने करावी. या संदर्भात तसेच प्रशिक्षणासाठी येणारा खर्च माहिती तंत्रज्ञान संचालनालयाकडील योजनांतर्गत तरतूदीमधून उपलब्ध करुन देण्यात यावा.

६) मा.आमदार महोदयांनी आपली आमदार म्हणून मुदत संपल्यानंतर लॅपटॉप/डेस्कटॉप व लेझर प्रिंटर संबंधीत जिल्हाधिकाऱ्यांकडे परत करावा.

७) या योजनेची अंमलबजावणी विधानमंडळ सचिवालयाच्या नियंत्रणाखाली राबविण्यात यावी.

(कृ.मा.प.

हा शासन निर्णय नियोजन विभाग व वित्त विभाग यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

मं.र. कर्णिक
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

राज्यपालांचे सचिव
मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव
सर्व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक
शासनाचे मुख्य सचिव
शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय (प्रसिध्दीसाठी)
* प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई
* प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई
* प्रबंधक, लोकआयुक्त व उप लोकआयुक्त यांचे कार्यालय, मुंबई
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
* प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
सर्व विभागीय आयुक्त
सर्व जिल्हाधिकारी
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
सर्व मंत्रालयीन विभाग
मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखाली सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
वित्त विभाग/व्यय ४, मंत्रालय
नियोजन विभाग/का.१४४५, मंत्रालय
निवड नस्ती

---------

GR-20020418 131129000-0104.